**व्यावसायिक पदविका अभ्यासक्रमाच्या संस्थेचे पदवी पातळीच्या संस्थेत रूपांतरण करण्यास, अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरून शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून शासन मान्यता देणेबाबत......**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. टीईएम-२०१८/प्र.क्र.२१२/तांशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २० जून, २०१८

संदर्भ : १) अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.वेस्टर्न/१-३५०८६५१९९४/२०१८/EOA, दिनांक ३०/०४/२०१८
२) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय यांचे पत्र क्रमांक २/एनजीसी/ रुपांतरण/२०१८/५९५, दिनांक १६.०५.२०१८

**प्रस्तावना :**

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी संदर्भ १) येथील पत्रान्वये "नूतन महाराष्ट्र विद्या प्रसारक मंडळाचे नूतन महाराष्ट्र विद्या पॉलिटेक्निक, पुणे " या पदविका संस्थेचे पदवी पातळीच्या संस्थेत रूपांतरण करण्यास मान्यता दिली आहे. सदर मान्यतेस अनुसरून संचालक, तंत्र शिक्षण यांनी संदर्भ २) येथील पत्रान्वये प्रस्तावित केल्याप्रमाणे सदर पदविका संस्थेचे पदवी पातळीच्या संस्थेत रूपांतरण करण्यास शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी संदर्भ १) येथील पत्रान्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन संचालक, तंत्र शिक्षण यांनी संदर्भ २) येथील पत्रान्वये प्रस्तावित केल्याप्रमाणे "नूतन महाराष्ट्र विद्या प्रसारक मंडळाचे नूतन महाराष्ट्र विद्या पॉलिटेक्निक, पुणे " या पदविका संस्थेचे "नूतन महाराष्ट्र विद्या प्रसारक मंडळाचे नूतन कॉलेज ऑफ इंजिनिअरींग ॲण्ड रिसर्च, पुणे" पदवी पातळीच्या संस्थेत रूपांतरण करण्यास, खाली नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून, शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदर संस्थेतील पदवी अभ्यासक्रम व त्यांची प्रवेशक्षमता सोबत जोडलेल्या प्रपत्र-अ (Annexure A) मध्ये नमूद केल्यानुसार असेल.

१) सदर मंजूरी कायम विना अनुदान तत्वावर राहील.

२) प्रस्तुत बाबतीत अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या तसेच दिनांक २१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील. सदर अभ्यासक्रमासाठी संस्थेची प्रवेश क्षमता वर नमूद केल्याप्रमाणे राहील.

३) शासनाने विहित केलेल्या तसेच अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

४) शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पर्यंत पदविका अभ्यासक्रमासाठी या संस्थेत प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांचा अभ्यासक्रम पूर्ण होईपर्यंत पदविका अभ्यासक्रमाचे वर्ग बंद करता येणार नाहीत.

५) पदवी अभ्यासक्रमासाठी नियुक्त करण्यात आलेल्या शिक्षकांचे विहित मार्गाने पदवी अभ्यासक्रमाच्या संस्थेमध्ये समावेशन करण्याची जबाबदारी संस्थेची राहिल. त्याबाबत कोणतेही न्यायालयीन प्रकरण उद्भवल्यास त्याची जबाबदारी शासनावर राहणार नाही.

६) सदर अभ्यासक्रमाच्या संलग्नीकरणासाठी संबंधित संस्थेने महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील तरतूदीनुसार संबंधित विद्यापीठाची मान्यता/ संलग्नीकरण घेणे आवश्यक राहील.

७) संबंधित संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण यांचेकडे आवश्यक ती संचित ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

८) सदर पदवी अभ्यासक्रमांचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार /पद्धतीनुसार करण्यात येतील.

९) शुल्क नियामक प्राधिकरणाने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्यूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

१०) संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास पूर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी शासन नियमाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत. तसेच शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इत्यादीबाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

११) संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना

अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

१२) रॅगिंग संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणेआवश्यक राहील.

१३) याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

१४) सदर संस्थेनेसंचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्याकडे प्रोसेसिंग फी अदा केलेली नसल्यास, त्या संस्थेकडून संचालकांनी अंतिम मान्यता देण्यापूर्वी ती वसूल करावी.

२. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६२०१६३९१३४४०८ असा आहे. सदर शासन निर्णय हा डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay A. Dharurkar

Digitally signed by Sanjay A. Dharurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, cn=Sanjay A. Dharurkar
Date: 2018.06.20 17:58:25 +05'30'

**( संजय औ.धारुरकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय, पुणे
३. कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्र शास्त्र विद्यापीठ, लोणेरे, ता. माणगाव, जि. रायगड.
४. प्राचार्य, नूतन महाराष्ट्र विद्या प्रसारक मंडळाचे नूतन कॉलेज ऑफ इंजिनिअरींग ॲण्ड रिसर्च, पुणे.
५. सदस्य सचिव अखिल भारतीय ,तंत्र शिक्षण परिषद ७ ,वा मजला चंद्रलोक, बिल्डींग जनपथ, नवी दिल्ली- ००१ ११०
६. विभागीय अधिकारी, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डींग, २ रा मजला, चर्चगेट, मुंबई
७. निवड नस्ती/तांशि-४.

शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. क्र.टीईएम-२०१८/प्र.क्र.२१२/तांशि-४,
दिनांक २० जून, २०१८ सोबतचे प्रपत्र-अ ( Annexure A )

| डीटीई संकेतांक व विद्यमान पदविका संस्थेचे नाव | रूपांतरण ( श्रेणीवर्धन ) झाल्यानंतर संस्थेचे नाव | अभ्यासक्रमाचे नाव | अभ्यास-क्रमाचा स्तर | प्रवेश क्षमता | संलग्नित विद्यापीठ |
|---|---|---|---|---|---|
| ६४१९ नूतन महाराष्ट्र विद्या प्रसारक मंडळाचे नूतन महाराष्ट्र विद्या पॉलिटेक्निक, पुणे | नूतन महाराष्ट्र विद्या प्रसारक मंडळाचे नूतन कॉलेज ऑफ इंजिनिअरींग ॲण्ड रिसर्च, पुणे | Computer science and Engineering | पदवी | ६० | डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्र - शास्त्र विद्यापीठ, लोणेरे, ता. माणगाव, जि. रायगड. |
| | | Computer science and Engineering | पदवी | ६० | |
| | | Mechanical Engineering ( Sandwich ) | पदवी | १२० | |
| | | Electronics & Communication Engineering ( Sandwich ) | पदवी | ६० | |
| | | Automobile Engineering. | पदवी | ६० | |